**जिल्हा गौरव समित्या बरखास्त झाल्यामुळे नवीन समित्या गठित होईपर्यंत स्वातंत्र्य सैनिकांच्या निवृत्तीवेतनाची प्रकरणे तपासून शासनाकडे पाठविण्याचे अधिकार जिल्हाधिका-यांना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिगौस-२००५/प्र.क्र.२८/स्वासैक-१**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक २३ मार्च २००५**

**पहाः**- शासन निर्णय क्रमांकः पीओएस-२००५/२/प्र.क्र.२/२००५/स्वासैक-१,दि.०१/०१/२००५.

**प्रस्तावनाः-** स्वातंत्र्य सैनिकांच्या निवृत्तीवेतनाचे प्रकरण तपासून शासनाकडे पाठविणे व अन्य संबंधित प्रकरणी निर्णय घेण्याच्या दृष्टीने जिल्हा स्तरावर गठीत करण्यात आलेल्या जिल्हा गौरव समित्या वरील दिनांक १ जानेवारी २००५ रोजीच्या शासन निर्णयानुसार बरखास्त करण्यात आलेल्या आहेत. अशा परिस्थितीत स्वातंत्र्य सैनिकांची निवृत्ती वेतनाची प्रकरणे प्रलंबित राहू नयेत, तसेच स्वातंत्र्य सैनिकांच्या दुर्दैवी निधनामुळे अंत्यसंस्कारासाठी मदत, मुलीचे लग्न, औषधोपचार इ. संदर्भात स्वातंत्र्य सैनिकांचे प्रश्न प्रलंबित राहू नयेत या दृष्टीने नवीन जिल्हा गौरव समित्या गठित होईपर्यंत त्यांचे अधिकार जिल्हाधिका-यांना प्रदान करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** नवीन जिल्हा गौरव समित्या गठित होईपर्यंत जिल्हाधिका-यांनी खाली नमूद केलेली कामे प्रचलीत शासन निर्णय, शासकीय धोरण व न्यायालयीन निर्णय यानुसार तपासून जिल्हा स्तरावर निर्णय घेणे शक्य असल्यास निर्णय घ्यावेत. जी प्रकरणे शासनास सादर करणे आवश्यक आहे अशी प्रकरणे शासनास सादर करण्यात यावीत.

१) जिल्ह्यातून जे अर्ज स्वातंत्र्य संग्राम सैनिक म्हणून पेन्शन किंवा इतर सवलतींसाठी येतात त्यावर शासकीय नियमाप्रमाणे अभिप्राय देणे.

२) जे स्वातंत्र्य संग्राम सैनिक किंवा त्यांचे वारस, औषधोपचार, मुलीचे लग्न किंवा स्वातंत्र्य सैनिक अथवा त्यांची विधवा किंवा विधूर दिवंगत झाल्यानंतर नियमानुसार अनुदानासाठी अर्ज करतात. त्या अर्जाचा निकाल त्वरीत होण्यासाठी मदत करणे.

३) स्वातंत्र्य संग्राम सैनिकांच्या पाल्यांना नोकरीमध्ये प्राप्त अग्रक्रमाप्रमाणे त्यांना नोकरी मिळेल ह्या दृष्टीने योग्य ती कार्यवाही आणि प्रयत्न करणे.

४) स्वातंत्र्य संग्राम सैनिकांचे मेळावे घेणे.

५) स्वातंत्र्य संग्राम सैनिकांना मदत, मार्गदर्शनासाठी तसेच त्यांच्या योग्य त्या अडचणी सोडविण्यास योग्य ती उपाययोजना करणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द.अ.शिंदे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रधान सचिव व वि.चौ.अ.(२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निवड नस्ती (२ प्रती)